कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) (अनुशेष), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, या पदी नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन आदेश क्रमांकः आपना ४५११/प्र.क्र.६९/पापु १५**

७ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल
मंत्रालय, मुंबई ४००००१
तारीख: १८ ऑक्टोबर, २०१४

वाचा -

**१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १७७९ (३१)/२५३१-अनुशेष/पंधरा, दिनांक ४ फेब्रुवारी,२०१४**

**शासन आदेश-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने श्री.युवराज आनंदराव जाधव यांची भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) (अनुषेश) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी केलेल्या शिफारशीनुसार त्यांना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमध्ये वेतन बँड रु.९३००-३४८०० , ग्रेड वेतन रु. ४५००/- अधिक त्यावर नियमानुसार मिळणारे महागाई व इतर भत्ते या वेतनश्रेणीत ते ज्या दिनांकापासून पदभार स्विकारतील, त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी परिच्छेद क्र.२ मध्ये दिलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून नेमणूक करण्यात येत आहेत.

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|
| ४ | श्री.युवराज आनंदराव जाधव | विजा (अ) | विजा (अ) महिलासाठीच्या राखीव एका पदाऐवजी |

२. अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहिल.

१) सदर उमेदवाराची भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमध्ये वेतन बँड रु.९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४५००/- अधिक त्यावर नियमानुसार मिळणारे महागाई व इतर भत्ते या वेतनश्रेणीत तो ज्या दिनांकापासून पदभार स्विकारील, त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी नेमणूक करण्यात येत आहे.

२) सदर उमेदवाराने आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या (३० दिवस) आत पदभार स्विकारावा.

३) सदर उमेदवार विहीत मुदतीत कामावर रुजू न झाल्यास संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनाकडे उचित कार्यवाहीसाठी अहवाल पाठवावा.

४) सदर उमेदवाराने पदग्रहण प्रतिवेदन संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्या मार्फत सादर करावे.

५) सदर उमेदवाराला परिविक्षा कालावधीमध्ये पहिल्या वर्षानंतर वेतनवाढ देण्यात यावी आणि त्यापुढील वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी.

६) सदर उमेदवाराला विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण व्हावी लागेल. तसेच, ते अगोदरच विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना त्या परिक्षेतून सूट मिळाली नसेल तर विहीत नियमानुसार विभागीय परीक्षा, मराठी व हिंदी भाषा परीक्षाही उत्तीर्ण व्हावी लागेल.

७) सदर उमेदवाराने कामाचा अपेक्षित दर्जा न राखल्यास आणि विहित विभागीय परीक्षा परिविक्षा कालावधीमध्ये उत्तीर्ण न केल्यास आणि अशा तऱ्हेने त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य आढळल्यास तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

८) सदर उमेदवाराला राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसुचना दिली पाहिजे. त्याला सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासनही एक महिन्याची पुर्वसूचना देईल. तथापी, त्याच्या सेवेच्या काळामध्ये गैरवर्तन व सेवेच्या शर्तीचा भंग झाला तर अशी पूर्वसुचना न देता त्याला कामावरून कमी करण्यात येईल. पूर्वसुचनेचा एक महिन्याचा कालावधी शासन वेळोवेळी जे बदल करील त्या बदलांना अधीन राहून ठरविण्यात येईल.

९) सदर उमेदवाराचा परिविक्षा कालावधी संपल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एमआरव्ही १०६२/डी, दिनांक २६/४/१९६२ मध्ये विहीत केलेल्या नमून्यात त्यांच्या कामाबाबतचा खास अहवाल (दोन प्रतीत) शासनाकडे पाठवावा.

१०) सदर उमेदवाराने त्याच्या साक्षांकन नमुन्यात दिलेल्या माहितीनुसार त्यांचे गोवा,पुणे व कोल्हापूर येथील वास्तव्याच्या कालावधीतील त्यांचे चारित्र्य/ पुर्वचारित्र्य पडताळणी होऊन त्याबाबतचा संबंधित पोलिस कार्यालयाचा अहवाल शासनास अद्याप प्राप्त झालेला नाही.तरी सदर उमेदवारास सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ९/१/२००९ च्या शासननिर्णयातील अटींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

११) सदर उमेदवाराची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असून त्यांच्या चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणीचा अहवाल असमाधानकारक असल्याचे निदर्शनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्यात नोटीस देवून समाप्त करण्यात येईल.

३. श्री.युवराज आनंदराव जाधव यांना उक्त परिच्छेदात नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून खालीलप्रमाणे नियुक्ती/पदस्थापना देण्यात येत आहे.

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|
| ४ | श्री. युवराज आनंदराव जाधव | संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे येथील रिक्त पदी |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१७१०४२४५२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.10.18 11:44:53 +05'30'

**( प्र. गि. कानडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे

२) महालेखाकार महाराष्ट्र-१ /२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षण /लेखा व अनुज्ञेयता)

३) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई (पत्राने)

४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,(सर्व)

५) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे

६) श्री. युवराज आनंदराव जाधव (संचालकांमार्फत)

७) निवडनस्ती पापु -१५